ग्राम पंचायतीतील कामाच्या ५% इतकी
रक्कम ग्राम निधीत जमा करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः- झेडपीए-२००८/प्र.क्र.४७४/वित्त-९,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- ३ डिसेंबर,२०११

वाचाः- १) शासन निर्णय क्रमांकः-झेडपीए-२०००/प्र.क्र.१८/वित्त-९, दिनांक १९ जानेवारी,२००१
२) शासन निर्णय क्रमांकः-झेडपीए-२००८/प्र.क्र.४७४/वित्त-९, दिनांक २ मार्च,२००९

प्रस्तावनाः-

संदर्भीय शासन निर्णयातील ५% रक्कम ग्राम निधीमध्ये जमा करण्याची अट शासनाने रद्द करावी अशी मागणी सर्व जिल्हा परिषदांकडून तसेच विधानसभा सदस्य यांचेकडून करण्यात आलेली आहे. ग्रामपंचायतीना देण्यात येणा-या विकास कामानुसार ५% रक्कम ग्राम निधीमध्ये जमा केली तर त्याचा परिणाम विकास कामाच्या दर्जावर होतो. त्याकरीता ग्रामपंचायतीच्या सचिवांना जबाबदार धरण्यात येते. त्यासाठी सदरील शासन निर्णयात बदल करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. या सर्व बाबी लक्षात घेता ५% टक्के रक्कम ग्राम निधीमध्ये जमा करण्याबाबतचे वरील अनुक्रमांक १ येथील दिनांक १९ जानेवारी,२००१ व अनुक्रमांक २ येथील दि. २ मार्च,२००९ रोजीचे शासन निर्णय रद्द करुन पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णयः-

ग्रामपंचायतींनी त्यांना मंजूर केलेल्या विकास कामांचा दर्जा राखून मंजूर केलेली कामे नियमानुसार पूर्ण करावी व पूर्ण केलेल्या कामांच्या देयकांचे प्रदान केल्यानंतर जी रक्कम शिल्लक राहील तेवढी रक्कम ग्रामपंचायतींच्या स्वनिधीमध्ये जमा करावी असा सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर शासन निर्णय त्यांचे अधिनस्त सर्व पंचायत समित्या व ग्रामपंचायतींना अंमलबजावणीस्तव उपलब्ध करुन द्यावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१११२०२०६२१५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(एकनाथ मोरे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
महालेखाकार ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखाकार ( लेखा व अनुज्ञेयता ) / ( लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-२, नागपूर.
वित्त विभाग,व्यय-१५ व अर्थसंकल्प-१९.
सर्व विभागीय आयुक्त ( विकास शाखा ),
संचालक तथा मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा कोकण भवन, नवी मुंबई
सह मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा नवी मुंबई,पुणे,नाशिक,औरंगाबाद,नागपूर,अमरावती.
सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदाचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व उप मुख्य लेखा परिक्षक अधिकारी ,स्थानिक निधी लेखा, सर्व जिल्हा परिषदा.
सर्व कार्यासन अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
निवड नस्ती, कार्यासन क्रमांक वित्त-९.

GR.lwp